विमानप्रवास सवलतीसाठी अमेरिकन एक्सप्रेस इंडियन एअरलाईन्स गोल्ड/सिल्व्हर (ग्रीन) कार्डची सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत....

स्पष्टीकरण...

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण-१००४/प्र.क्र.४७(अ)/सेवा-५
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दि.१६मे, २००५

**पहा:-** (१) शासन निर्णय,वित्त विभाग,क्रमांक:संकीर्ण-१००४/प्र.क्र.४७(अ), सेवा-५, दि.११ जानेवारी, २००५
(२) शासन शुध्दिपत्रक, क्रमांक:संकीर्ण-१००४/प्र.क्र.४७(अ)/ सेवा-५, दि.३१ जानेवारी, २००५

## परिपत्रक

वरील (१) व (२) येथील आदेशान्वये प्रवासभत्त्यावरील,मुख्यत्वे विमान प्रवासावरील, खर्चात बचत व्हावी म्हणून अमेरिकन एक्सप्रेस सर्व्हिस इंडिया लिमिटेड, मुंबई या कंपनीने उपलब्ध करुन दिलेल्या गोल्ड/सिल्व्हर कार्डच्या सुविधांचा लाभ अनुज्ञेय ठरविण्यात आला आहे. सदर योजनेसंबंधात काही मुद्दे उपस्थित करण्यात आले आहेत. त्या संदर्भात शासन खालीलप्रमाणे खुलासा करीत आहे.

| मुद्दे | स्पष्टीकरण |
|---|---|
| (१) शासकीय दौरा इ. च्या विमान प्रवासाची तिकीटे सदर कार्डवर खरेदी करणे बंधनकारक करण्यात आले आहे याचा अर्थ सदर कार्ड खरेदी करणे बंधनकारक आहे काय? | सदर कार्डचा वापर केवळ शासनासाठीच नव्हे तर वैयक्तिकरित्या अधिका-यांसाठीही खूप फायदेशीर आहे. तथापि, जर अधिकारी या योजनेचा फायदा घेऊ इच्छित नसतील तर त्यांना ही योजना न स्विकारण्याचा विकल्प उपलब्ध आहे. |
| (२) सदर कार्डवर खरेदी केलेल्या विमानाच्या तिकीटांची रक्कम विहित मुदतीत न भरल्यास विलंब/दंड/व्याज आकारण्यात आल्यास, त्याची जबाबदारी संबंधित अधिका-यांवर टाकणे योग्य नाही, कारण प्रवासाची देयके शासनाकडून मिळण्यास बहुधा विलंब लागतो. सदर अट काढून टाकण्यात यावी. | या कार्डावर खरेदी करण्यात आलेल्या तिकीटाचे शुल्क अदा करण्यास विलंब झाल्याने काही दंड/विलंब शुल्क, व्याज इ. आकारण्यात आल्यास त्याविषयीची सर्व जबाबदारी त्या अधिका-याचीच असेल ही बाब या अगोदरच स्पष्ट करण्यात आली आहे. तेव्हा, तिकीटाचे शुल्क अदा करतांना कोणत्याही कारणास्तव विलंब होणार नाही याविषयीची दक्षता संबंधित अधिका-यांनीच घ्यावयाची आहे. विलंबाच्या प्रकरणी व्याज/ विलंब शुल्क इ. मंजूर करणे वित्त विभागास |

कृ.मा.प.

शक्य नाही. सदर योजना, आहे त्या स्वरुपात संपूर्णपणे स्वीकारायची वा नाकारायची, याचा निर्णय अधिका-यांनीच घ्यावयाचा आहे. याशिवाय अधिका-यांनी गोल्ड/सिल्व्हर कार्ड घेतल्यानंतर त्यांच्याकडून कार्डवर जेव्हा शासकीय दौरा,बदलीनंतरचा प्रवास,स्वग्राम रजा प्रवास सवलत किंवा रजा प्रवास सवलतीसाठी विमान प्रवासाची तिकीटे खरेदी केली जातील तेव्हाच कार्डच्या वार्षिक फी ची प्रतिपूर्ती अनुज्ञेय होईल ही बाब प्रसंगवशात पुन्हा निदर्शनास आणण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**मीना अ. जोशी**
**शासनाच्या उप सचिव**

प्रति,

प्रधान महालेखापाल-१(लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
विशेष आयुक्त व प्रधान सचिव,महाराष्ट्र सदन,नवी दिल्ली
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
* प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
मंत्रालयीन सर्व विभाग
मुख्य सचिव व सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव/सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक/स्वीय सहायक
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई
अमेरिकन एक्सप्रेस सर्व्हिस इंडिया लिमिटेड, एपीजे बिझिनेस सेंटर, एपीजे हाऊस, ३ दिनशॉ वाच्छा रोड, चर्चगेट, मुंबई-४०० ०२०.
निवड फाईल, वित्त विभाग/ सेवा-५

*पत्राद्वारे

--------------